**अलिबाग विक्रीकर कार्यालयाचे कामकाज कोकणभवन, बेलापूर नवी मुंबई येथून करण्यास मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक संकिर्ण- १०१७/प्र.क्र.२ /वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-२७ जानेवारी २०१७.

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विकवि १२११/प्र.क्र.२९१/विप्र-४, दि. १८/११/२०११.
२) विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. विविआ/आस्था ३ (पुनर्रचना कक्ष)/२०१६/ब-७०६, मुंबई, दि. ७/१०/२०१६.

**प्रस्तावना** :-

संदर्भाधिन शासन निर्णय दि. १८/११/२०११ अन्वये अलिबाग (रायगड जिल्हयाचे मुख्यालय) येथे नवीन विक्रीकर कार्यालय स्थापन करण्यात आले आहे. अलिबाग या कार्यालयाचे कार्यक्षेत्र रायगड जिल्हयातील पनवेल, उरण, कर्जत, खालापूर हे तालुके वगळून उर्वरित रायगड जिल्हा असे आहे. सद्य:स्थितीत अलिबाग विक्रीकर कार्यालयाचे दैनंदिन कामकाज जागेच्या उपलब्धतेअभावी कोकण भवन, बेलापूर, (नवी मुंबई) येथून करण्यात येत आहे. अलिबाग विक्रीकर कार्यालयाचे कामकाज घोषित मुख्यालयाव्यतिरिक्त अन्य ठिकाणहून करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

संदर्भाधीन दि.१८.११.२०११ च्या शासन निर्णयास अनुसरुन नवनिर्मित अलिबाग विक्रीकर कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत बांधून कार्यालय स्थानांतरणास तसेच विक्रीकर सहआयुक्त (व्हॅट प्रशा) रायगड विभाग यांनी दिलेल्या जाहिरातीच्या अनुषंगाने अलिबाग येथे भाडयाने जागा घेऊन कार्यालय सुरु करण्यासाठी काही कालावधी लागणार आहे. अलिबाग विक्रीकर कार्यालयाचे दैनंदिन कामकाज जागेच्या उपलब्धतेअभावी त्यांचे घोषित मुख्यालय अलिबाग याऐवजी **तात्पुरत्या कालावधीसाठी** कोकणभवन, बेलापूर (नवी मुंबई) येथून पार पाडण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मान्यता अलिबाग विक्रीकर कार्यालय निर्माण करण्यात आल्याच्या दिनांकापासून असून अलिबाग विक्रीकर कार्यालयाच्या नवीन इमारतीचे बांधकाम होऊन कार्यालय स्थलांतर होईपर्यंत अथवा आलिबाग येथे भाडयाने जागा घेऊन कार्यालय सुरु होईपर्यंत अंमलात राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२७१६४८४३५३०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dattatraya E Ghanavat

Digitally signed by Dattatraya E Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffcae55bba934d42bad451952ab66c, cn=Dattatraya E Ghanavat
Date: 2017.01.27 16:46:55 +05'30'

**(द.ए. घनवट)**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव मुंबई-४०० ०१०.

२) विशेष विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव मुंबई- ४०० ०१०.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र,मुंबई.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा ) -१ महाराष्ट्र,मुंबई.
५) अपर विक्रीकर आयुक्त ठाणे विक्रीकर कार्यालय, ठाणे क्षेत्र, ठाणे.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अलिबाग, रागगङ
८) निवड नस्ती , विक्रीकर (प्रशा-४) .